आस्थापना - कोकण विभाग
एकूण १३१५ अस्थायी पदांना दिनांक १ सप्टेंबर, २०२० ते दिनांक २८ फेब्रुवारी, २०२१ या कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ईएसटी -२०२०/प्र.क्र. ४१/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २४ सप्टेंबर, २०२०

**संदर्भ :-**

१. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : संकिर्ण-१००२/प्र.क्र. ६६(भाग-२)/ई-८, दिनांक २०/०३/२००६.
२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : प्राफेब-२०१०/प्र.क्र.-२६/पुनर्बांधणी-३/म-१०, दिनांक ३०/०७/२०१३.
३. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : ईएसटी-२०१७/प्र.क्र. ३४/ई-८, दिनांक १३/०४/२०१७.
४. शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांकः ईएसटी-२०१९/प्र.क्र.३४/ई-८, दि.०४/०४/२०१९ व दि.१७/१०/२०१९
५. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दि.१२/२/२०२०
६. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : ईएसटी-२०१७/प्र.क्र. ४१/ई-८, दिनांक ०१/०६/२०२०.
७. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दि.३१/०८/२०२०

**प्रस्तावना:-**

वित्त विभागाच्या दि.१२/०२/२०२० च्या शासन निर्णयास अनुसरुन विभागीय आयुक्त कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांच्या कार्यालयाच्या आस्थापनेवरील तसेच जिल्हाधिकारी, मुंबई शहर, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग यांच्या आस्थापनेवरील व त्यांच्या अधिपत्याखालील उप विभागीय अधिकारी, तहसिलदार व मंडळ अधिकारी या क्षेत्रिय कार्यालयातील आकृतीबंधातील एकूण १३१५ अस्थायी पदांना दि. ०१/०३/२०२० ते दि. ३१/०८/२०२० या कालावधीसाठी महसूल व वन विभागाच्या संदर्भाधिन दिनांक ०१/०६/२०२० च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दिनांक ३१/०८/२०२० च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि. ०१/०९/२०२० ते दि. २८/०२/२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत. त्यास अनुसरुन कोकण विभागातील विभागीय आयुक्त व त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालयांच्या

आस्थापनेवरील आकृतीबंधाबाहेरील १३१५ अस्थायी पदांना वरील कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

विभागीय आयुक्त कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांच्या कार्यालयाच्या आस्थापनेवरील तसेच जिल्हाधिकारी, मुंबई शहर, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग यांच्या आस्थापनेवरील व त्यांच्या अधिपत्याखालील उप विभागीय अधिकारी, तहसिलदार व मंडळ अधिकारी या क्षेत्रिय कार्यालयातील आकृतीबंधातील संदर्भाधीन क्र. ३ येथील दि. १३/०४/२०१७ च्या शासन निर्णयासोबत जोडलेल्या २० विवरणपत्रामधील एकूण १३१५ अस्थायी पदांना **दिनांक १ सप्टेंबर, २०२० ते दिनांक २८ फेब्रुवारी, २०२१** या कालावधीसाठी वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.३१/०८/२०२० च्या शासन निर्णयातील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर अस्थायी पदांवर होणारा खर्च संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन निर्णयासोबतच्या संबंधित विवरणपत्रातील रकाना- क्र. ६ मध्ये दर्शविलेल्या लेखाशिर्षाखालील सन २०२०-२१ साठी मंजूर झालेल्या अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा.

३. **वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. ०५ च्या शासन निर्णयात दरम्यानच्या काळात सुधारित आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याबाबत सर्व प्रशासकीय विभागांनी दक्षता घेण्याबाबत वित्त विभागाने निर्देशित केले आहे. त्यानुषंगाने सदर प्रकरणी उचित कार्यवाही करण्यात यावी.**

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.३१/०८/२०२० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००९२४१७०१२०७८१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=3d2bd4ed83b4c722151f75f40dad09e69527159e04d26476bbf5363e7b1c3cb2, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=704cb545c50221b15cde7ccb8854e694c765dfb3a0240e891ebfb56ee79e3440, ou=REVENUE, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2020.09.24 17:02:06 +05'30'

**(अजित देशमुख)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
२. जिल्हाधिकारी, मुंबई शहर/ मुंबई उपनगर /ठाणे / पालघर/ रायगड / रत्नागिरी / सिंधुदुर्ग.
३. अपर जिल्हाधिकारी / उप विभागीय अधिकारी / तहसीलदार/ मंडळ अधिकारी (संबंधित जिल्हाधिकारी यांचेमार्फत)
४. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १, महाराष्ट्र, मुंबई.
५. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा) १, महाराष्ट्र, मुंबई.

६. अपर कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे / पालघर/ रायगड / रत्नागिरी / सिंधुदुर्ग.
१०. सह सचिव/उप सचिव, कार्यासन व्यय-९/आ.पु.क., वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११.उप सचिव, कार्यासन ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२.निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.